प्रशासकीय मान्यता-

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत
(NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM))
सन २०१५-१६ च्या वार्षिक कृति
आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
(रू. १२७८.०० लाख रकमेच्या कार्यक्रमास).

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक २५१५/प्र.क्र. १६८ /१७ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २ नोव्हेंबर, २०१५

वाचा -

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाअंतर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन या योजनेच्या मार्गदर्शक सुचना
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-१/२०१५/Fert Use, दि.२९ एप्रिल २०१५ चे पत्र
३) केंद्र शासनाचे क्र. १४-२/२०१५ - फर्ट युज, दि. १४ जूलै २०१५ चे पत्र
४) कृषि आयुक्तलयाचे क्र. डीडीएसएसएसटी/ इनपुट ॲण्ड क्युसी /एनएमएसए/ एसएचएम /४२४/१०१५ दिनांक २४ जुलै २०१५ चे पत्र
५) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पूरक २५१५/प्र.क्र. १६८/१७ अे, दि. ३ ऑक्टोंबर, २०१५
६) केंद्र शासनाचे पत्र क्र .१४-२०/२०१४/Fert Use, दि.१८ सप्टेंबर, २०१५ चे पत्र

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ६ येथील दि. १८ सप्टेंबर, २०१५ च्या पत्रास अनुसरून या विभागाच्या समक्रमाकांचा संदर्भ क्र. ५ येथील दि. ३ ऑक्टोंबर, २०१५ चा शासन निर्णय अधिक्रमित करून रू. २३८५.०० लाख रकमेच्या कार्यक्रमाऐवजी रू. १२७८.०० लाख रकमेचा कार्यक्रम राबविण्याकरीता पुढील प्रमाणे सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

योजना आयोगाने नियुक्त केलेल्या बी. के. चतुर्वेदी समितीच्या शिफारशी केंद्र शासनाने स्वीकारल्या आहेत. त्यास अनुसरुन सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये केली आहेत. केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासुन केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना केली असुन काही योजना एकत्रित करून अभियान म्हणुन राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर पुर्नरचनेमध्ये राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान (NMMI),

राष्ट्रीय सेंद्रिय शेती प्रकल्प ( NPOF), राष्ट्रीय मृदा आरोग्य व सुपिकता व्यवस्थापन प्रकल्प ( NPMSH & F) आणि कोरडवाहू शाश्वत शेती कार्यक्रम ( RADP) या सर्व योजना एकत्रितरित्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान ( NMSA) म्हणुन राबविण्यात येणार आहे. या अभियानामध्ये पुढील घटकाचा समावेश करण्यात आला आहे.

१) अवर्षणप्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (RAD)

२) शेतीवरील पाणी व्यवस्थापन अभियान ( OFWM)

३) मृदा आरोग्य व्यवस्थापन ( SHM)

४) वातावरण बदल आणि शाश्वत शेती : सनियंत्रण, रचना व संजालन (CCSAMMN).

वरील पैकी मृद आरोग्य व्यवस्थापन ( SHM ) या उपअभियानातंर्गत फिरती / स्थायी मृद चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करणे, शासकीय मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांच्या बळकटीकरण करणे व खत नियंत्रण प्रयोगशाळेच्या बळकटीकरणाकरीता अर्थसहाय्य देणे हे घटक राबविण्यात येणार आहे.

सन २०१४-१५ मध्ये केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ७५ : २५ असे होते. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ३ येथील दि. १४ जुलै २०१५ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य ५० : ५० या प्रमाणात सदर योजना राबविण्याचे प्रस्तावित आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ६ येथील दि. १८ सप्टेंबर, २०१५ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार सदर योजना सन २०१५-१६ या वर्षासाठी केंद्र हिस्सा रू. ६३९.०० लक्ष व राज्य हिस्सा रू. ६३९.०० लक्ष असा एकुण रू. १२७८.०० लक्ष एवढ्या रकमेचा कार्यक्रम राबविण्यात येणार आहे. सदर कार्यक्रम राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत ( NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन हे उपअभियान सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिस्सा ( ५० टक्के) रू. ६३९.०० लक्ष व राज्य हिस्सा ( ५० टक्के) रू. ६३९.०० लक्ष अशा एकुण रु. १२७८.०० लाख ( रु. बारा कोटी अठ्ठ्याहत्तर लाख फक्त ) एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर उपअभियानातंर्गत रु. १२७८ .०० लाख निधीचा घटकनिहाय भौतिक व आर्थिक कार्यक्रम पुढीलप्रमाणे राहील.

( रू. लाखात)

| अ.क्र. | घटक | भौतिक | आर्थिक (प्रति प्रयोगशाळा दर) | केंद्र हिस्सा ( ५० टक्के) | राज्य हिस्सा ( ५० टक्के) | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | फिरती / स्थायी मृद चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करणे | १३ | ७५.०० | ३६४.०० | ३६४.०० | ७२८.०० |
| २ | शासकीय मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे. | १० | ४०.०० | २००.०० | २००.०० | ४००.०० |
| ३ | खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे. | ५ | ३०.०० | ७५.०० | ७५.०० | १५०.०० |
| एकुण | | | | ६३९.०० | ६३९.०० | १२७८.०० |

**३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा. त्याप्रमाणे अनुसूचित जाती / जमाती / महिला लाभार्थ्यासाठी खर्चाचे लेखे वरील प्रमाणे ठेवण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेची राहील.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, पुणे. यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

४. कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे सनियंत्रण अधिकारी म्हणुन काम पाहतील व सहाय्यक संचालक, लेखा -१ कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ ( २) ( ब ) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०२११५८१३४१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Akusing Narshi Vasave
Date: 2015.11.02 11:59:25 +05'30'

( आ.न. वसावे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे

३) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर

४) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे

५) सर्व विभागीय कृषि सहसंचालक

६) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव

७) अपर मुख्य सचिव (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-

८) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१०) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई

११) नियोजन विभाग-१४३१

१२) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवडनस्ती.